**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ७९ गावे वाढीव प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. अंजनगाव व दर्यापूर, जि. अमरावती या योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र.४८/पापु-१९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३१ मार्च, २०१७

वाचा

१) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र क्रमांक : मजीप्रा/मुअ/तांशा-१/७९ गा.वा.प्रा.पापुयो/३७२/२०१७, दि.२४.३.२०१७.
२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र क्रमांक: जा.क्र.मुअ/मजीप्रा/अम/रेचिशा/३७०, दिनांक २४.३.२०१७.
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
५) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
६) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
९) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०१५
१०) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १० मार्च, २०१५
११) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
१२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
१३) शासन निर्णय क्रमांक: मुपयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी २०१७

**प्रस्तावना:-**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ७९ गावे वाढीव प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. अंजनगाव व दर्यापूर, जि. अमरावती या योजनेच्या रु.६८०३.७८ लाख इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र. १ येथील

पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे. सदर योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी त्यांच्या संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. सदर योजनेचा मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमामध्ये समावेश करण्यास मा. मुख्यमंत्री महोदयांनी विशेष बाब म्हणून मान्यता दिली आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ७९ गावे वाढीव प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. अंजनगाव व दर्यापूर, जि. अमरावती प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ६८०३.७८ लाख इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, ७९ गावे वाढीव प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. अंजनगाव व दर्यापूर, जि. अमरावती या योजनेतील ४९ निम शहरी गावांकरिता ७० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या व ३२ बिगर निम शहरी गावांकरिता ५५ लिटर दरडोई दर दिवशी क्षमतेच्या रु. ५७५८/- इतका दरडोई खर्च असलेल्या प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेचा मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत समावेश करण्यास मा. मुख्यमंत्री महोदयांनी विशेष बाब म्हणून मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर योजनेच्या रु. ६८०३.७८ लाख (अक्षरी रुपये अडुसष्ट कोटी तीन लाख अठ्याहत्तर हजार फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास (सन २०१५-१६ च्या दरसुचीनुसार) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी करावी. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर **किमान ३ वर्षे योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक** राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे याची खात्री महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने करावी व योजनेच्या देखभाल दुरुस्तीसाठी संदर्भाधीन क्र.७ येथील दि.१७ ऑक्टोबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करावा.

II. योजनेची कामे विहीत पध्दतीने ई- निविदा मागविण्यात येऊन करावीत. **जादा किंमतीच्या निविदा स्वीकृत करु नयेत.** योजनेचे काम प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. योजनेची किंमत वाढल्यास त्याला राज्य शासन जबाबदार राहणार नाही व अशा योजना कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यास पात्र राहतील. तसेच त्याची शासनस्तरावर गंभीर दखल घेऊन संबंधितांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

III. **योजनेसाठी आवश्यक सर्व भुसंपादन व इतर सर्व परवानग्या (जलसंपदा विभागाचा पाणी आरक्षण परवाना, वने/रेल्वे/रस्ते क्रॉसिंग इ.) प्राप्त झाल्याशिवाय योजनेच्या निविदा**

**मागविण्यात येऊ नयेत. सदर अटीची पूर्तता न करताच निविदा मागविण्यात आल्यास या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द समजण्यात येईल.**

IV. योजनेची कामे मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या टप्पा-टप्याने पुर्ण करण्यात यावीत.

V. योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

**VI. योजनेतून ठोक स्वरुपात पाणी घेणेबाबत प्रत्येक ग्रामपंचायतीसोबत करारनामा करण्यात यावा.**

VII. योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता व योजना आर्थिकदृष्ट्या स्वंयपूर्ण होण्यासाठी संबंधित ग्रामपंचायतीने घरगुती नळ धारकासाठी किमान पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

VIII. योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

IX. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

X. अस्तित्वातील स्त्रोताचे बळकटीकरण करण्यात यावे.

XI. संदर्भाधीन क्र.५ येथील २२ जानेवारी, २०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार हागणदारी मुक्तीचे धोरण राबविण्यात यावे.

**XII. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.**

XIII. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र.१२ येथील **दि.०७ मे, २०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.**

XIV. संदर्भाधीन क्र.११ येथील दि.१५ जून, २०१५ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार योजनेचे **त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य राहील.**

XV. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील, याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरूवात करावी.

XVI. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिका-याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

XVII. **योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.**

XVIII. संदर्भाधीन क्र.१२ येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार ग्रामीण **पाणीपुरवठा योजनांकरिता विहित केलेली मानके पूर्ण करणे बंधनकारक** राहील.

XIX. योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर यांची राहील.

२. या योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२७) बंद पडलेल्या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन (२२१५ ९९५१)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११५०३४५३९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a016826b42bfd50da9289adab7343d06945234ea788393fe61e0e12977ee7728, cn=Ram Apparao Sabane
Date: 2017.03.31 18:42:29 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) जिल्हाधिकारी, अमरावती.
६) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती.
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.

९) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.
११) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१२) कार्यासन पापु-०४, पापु-१३ व पापु-२० पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती पापु-१९